**मा.सर्वोच्च न्यायालयाच्या आदेशाप्रमाणे दिनांक ०१.०१.२००६ रोजी अथवा तद्नंतर सेवानिवृत्त झालेल्या राज्यातील दुय्यम न्यायालयातील सेवानिवृत्त न्यायिक अधिकाऱ्यांना मा.न्या.पद्मनाभन समितीने केलेल्या शिफारशीनुसार सेवानिवृत्तीवेतन व भत्ते देण्याबाबत..**

**महाराष्ट्र शासन**
**विधी व न्याय विभाग,**
**शासन शुध्दीपत्रक क्र.एचसीटी-२००९/प्र.क्र.१४१/का-तीन**
**मंत्रालय, मुंबई ४०० ०३२.**
**दिनांक : ३० मार्च, २०११.**

**पहा :-** शासन निर्णय क्रमांक : एचसीटी-२००९/प्र.क्र.१४१/का-तीन, दि. ५ जानेवारी, २०११.

**शुध्दीपत्रक :-**

विधी व न्याय विभागाच्या शासन निर्णय क्र.एचसीटी-२००९/प्र.क्र.१४१/का-तीन, दिनांक ५ जानेवारी,२०११ मध्ये पुढीलप्रमाणे सुधारणा करण्यात येत आहेत :-

**१) वरील शासन निर्णयातील पृष्ठ क्र.२ मधील तरतूद क्रमांक १ :-**

" दुय्यम न्यायालयातील न्यायिक अधिकाऱ्यांना संपूर्ण सेवानिवृत्ती वेतनाचा लाभ मिळण्यासाठी किमान २० वर्षांचा सेवा कालावधी आवश्यक आहे."

**या ऐवजी खालीलप्रमाणे वाचावे -**

**" दिनांक १.१.२००६ रोजी अथवा तद्नंतर सेवानिवृत्त झालेल्या दुय्यम न्यायालयातील न्यायिक अधिकाऱ्यांना संपूर्ण सेवानिवृत्ती वेतनाचा लाभ मिळण्यासाठी किमान २० वर्षाचा अर्हताकारी सेवा कालावधी आवश्यक राहील. तसेच किमान निवृत्तीवेतन मिळण्यासाठी न्यायिक अधिकाऱ्याची किमान १० वर्ष अर्हताकारी सेवा आवश्यक राहील."**

**२) वरील शासन निर्णयातील पृष्ठ क्र.३ मधील तरतूद क्रमांक ६ :-**
" दिनांक २.९.२००८ " या तारखे ऐवजी **" दिनांक १.१.२००६ " असे वाचण्यात यावे,**

**३) वरील शासन निर्णयातील पृष्ठ क्र.३ मधील तरतूद क्रमांक ८ : -**

" ६५ वर्षे वयापेक्षा जास्त वयोगटातील निवृत्ती वेतन धारकांना/कौटुंबिक निवृत्तीवेतन धारकांना खालील तक्त्याप्रमाणे अतिरिक्त निवृत्तीवेतनाचे फायदे देण्यात येतील."

60D:\desktop backup60 G R MEENA 7.10.lwp

| निवृत्तीवेतन धारक / कौटुंबिक निवृत्ती वेतन धारक | अतिरिक्त निवृत्तीवेतन |
|---|---|
| ७० ते ७५ वर्षापर्यंत | सुधारीत मूळ निवृत्तीवेतन / कौटुंबिक निवृत्तीवेतनाच्या १०% |
| ७५ ते ८० वर्षापर्यंत | सुधारीत मूळ निवृत्तीवेतन / कौटुंबिक निवृत्तीवेतनाच्या २०% |
| ८० ते ८५ वर्षापर्यंत | सुधारीत मूळ निवृत्तीवेतन / कौटुंबिक निवृत्तीवेतनाच्या ३०% |
| ८५ ते ९० वर्षापर्यंत | सुधारीत मूळ निवृत्तीवेतन / कौटुंबिक निवृत्तीवेतनाच्या ४०% |
| ९० ते १०० वर्षापर्यंत | सुधारीत मूळ निवृत्तीवेतन / कौटुंबिक निवृत्तीवेतनाच्या ५०% |
| १०० वर्षे किंवा त्यापेक्षा अधिक | सुधारीत मूळ निवृत्तीवेतन / कौटुंबिक निवृत्तीवेतनाच्या १००% |

**या ऐवजी खालील प्रमाणे वाचण्यात यावे.**

**" ८० वर्षे वयापेक्षा जास्त वयोगटातील निवृत्ती वेतन धारकांना / कुटुंब निवृत्तीवेतन धारकांना खालील तक्त्याप्रमाणे अतिरिक्त निवृत्तीवेतनाचे (additional quantum of pension) फायदे देण्यात येतील."**

| निवृत्तीवेतन धारक / कुटुंब निवृत्ती वेतन धारक | अतिरिक्त निवृत्तीवेतन |
|---|---|
| ८० ते ८५ वर्षापर्यंत | सुधारीत मूळ निवृत्तीवेतन / कुटुंब निवृत्तीवेतनाच्या २०% |
| ८५ ते ९० वर्षापर्यंत | सुधारीत मूळ निवृत्तीवेतन / कुटुंब निवृत्तीवेतनाच्या ३०% |
| ९० ते ९५ वर्षापर्यंत | सुधारीत मूळ निवृत्तीवेतन / कुटुंब निवृत्तीवेतनाच्या ४०% |
| ९५ ते १०० वर्षापर्यंत | सुधारीत मूळ निवृत्तीवेतन / कुटुंब निवृत्तीवेतनाच्या ५०% |
| १०० वर्षे किंवा त्यापेक्षा अधिक | सुधारीत मूळ निवृत्तीवेतन/ कुटुंब निवृत्तीवेतनाच्या१००% |

**४) वरील शासन निर्णयातील पृष्ठ क्र.३, परिच्छेद क्र.२ मधील :-**

दुय्यम न्यायालयातील सेवानिवृत्त न्यायिक अधिकाऱ्यांना द्यावयाचे सुधारीत निवृत्तीवेतन व अनुषंगिक फायदे / सुविधा पुढील प्रमाणे आहेत.

**सेवानिवृत्त न्यायिक अधिकाऱ्यांकरीता भत्ते व इतर सुविधा**

| अ.क्र. | भत्ता सुविधा तपशील | मा.न्या.पद्मनाभन समितीच्या शिफारशी प्रमाणे दर रु.(द.म.) |
|---|---|---|
| १ | निवृत्तीवेतन | दि.१.१.२००६ रोजी व त्यानंतर सेवानिवृत्त झालेल्या / होणा-या अधिका-यांकरीता निवृत्तीवेळेच्या वेतनाच्या किमान टप्याच्या ५० टक्के; दि.१.१.२००६ नंतर निवृत्त होणा-यांकरीता केंद्रशासनाच्या कर्मचा-यांप्रमाणे. |
| २ | वैद्यकीय भत्ता | १५००/- |
| ३ | शिपाई भत्ता | २५००/- |
| ४ | घरगडी भत्ता | ७५०/- कुटुंब निवृत्तीवेतन धारकासाठी |

61D:\desktop backup61 G R MEENA 7.10.lwp

**याऐवजी खालीलप्रमाणे वाचण्यात यावे.**

**" दिनांक १.१.२००६ रोजी अथवा तद्नंतर सेवानिवृत्त झालेल्या दुय्यम न्यायालयातील न्यायिक अधिकाऱ्यांना द्यावयाचे सुधारीत निवृत्तीवेतन व अनुषंगिक फायदे / सुविधा पुढील प्रमाणे राहतील "**

**सेवानिवृत्त न्यायिक अधिकाऱ्यांकरीता भत्ते व इतर सुविधा**

| अ.क्र. | भत्ता सुविधा तपशील | मा.न्या.पद्मनाभन समितीच्या शिफारशीप्रमाणे दर रु.(दरमहा) |
|---|---|---|
| १ | निवृत्तीवेतन | क्रमांक:एचसीटी-२००९/प्रक्र.१४१/का-तीन, दि. ५ जानेवारी, २०११ च्या शासन निर्णयातील पृष्ठ क्र.२ मधील तरतूद क्र.२ प्रमाणे निवृत्तीवेतन देय राहील. |
| २ | वैद्यकीय भत्ता | सेवा निवृत्त न्यायिक अधिकारी - रु .१५००/-दरमहा<br>कुटुंब निवृत्ती वेतन धारक - रु.७५०/-दरमहा |
| ३ | घरगडी भत्ता | सेवा निवृत्त न्यायिक अधिकारी - रु.२५००/-दरमहा<br>कुटुंब निवृत्तीवेतन धारक - रु.१०००/- दरमहा |

५) दि.०५ जानेवारी, २०११ च्या शासन निर्णयामधील पृष्ठ क्र.३ परिच्छेद क्र.२ नंतर परिच्छेद क्र.२.१. समाविष्ठ करून खालील प्रमाणे वाचण्यात यावा :-

**२.१ दि.०१.०१.२००६ पूर्वी सेवानिवृत्त झालेल्या दुय्यम न्यायालयातील न्यायिक अधिकाऱ्यांचे निवृत्तीवेतन व अनुषंगिक भत्ते हे खालीलप्रमाणे राहतील :-**

**(१)निवृत्तीवेतन :** दि.०१.०१.२००६ पूर्वी सेवानिवृत्त झालेल्या दुय्यम न्यायालयातील न्यायिक अधिकाऱ्यांचे सुधारित निवृत्तीवेतन त्यांनी सेवानिवृत्तीच्यावेळी धारण केलेल्या पदासाठी देय असलेल्या व वेळोवेळी सुधारित झालेल्या मुळवेतनाच्या किमान ५०% अनुज्ञेय राहील.

(२) कमाल निवृत्तीवेतनावर मर्यादा राहणार नाही.

(३) दि.०१.०१.२००६ पूर्वी सेवानिवृत्त झालेल्या दुय्यम न्यायालयांतील न्यायिक अधिकाऱ्यांना कार्यरत न्यायिक अधिकाऱ्यांप्रमाणेच राहणीमानाच्या दर्जामध्ये वाढ होण्याच्या अनुषंगाने (Neutralization of the cost of living in the same scale as is being extended to the serving judicial officers) मिळणारे फायदे देय राहतील.

(४) दि.०१.०१.२००६ पूर्वी सेवानिवृत्त झालेल्या दुय्यम न्यायालयांतील न्यायिक अधिकाऱ्यांना व कुटुंबनिवृत्तीवेतनधारकांना पुढीलप्रमाणे अनुषंगिक भत्ते अनुज्ञेय राहतील.

| अ.क्र. | भत्ता सुविधा तपशील | मा.न्या.पद्मनाभन समितीच्या शिफारशीप्रमाणे दर (दरमहा) |
|---|---|---|
| १ | वैद्यकीय भत्ता | सेवानिवृत्त न्यायिक अधिकारी - रु.१,५००/-<br>कुटुंबनिवृत्तीवेतनधारक - रु. ७५०/- |
| २ | घरगडी भत्ता | सेवानिवृत्त न्यायिक अधिकारी - रु.२,५००/-<br>कुटुंबनिवृत्तीवेतनधारक - रु.१,०००/- |

(५) दि.०१.०१.२००६ पूर्वी सेवानिवृत्त झालेल्या दुय्यम न्यायालयांतील न्यायिक अधिकाऱ्यांना सुधारित निवृत्तीवेतन व अनुषंगिक भत्ते हे दि.०१.०१.२००६ पासून लागू राहतील.

(६) दि.०१.०१.२००६ पूर्वी सेवानिवृत्त झालेल्या दुय्यम न्यायालयांतील न्यायिक अधिकाऱ्यांना व कुटुंबनिवृत्तीवेतनधारकांना राज्य शासनाचे सेवानिवृत्तीवेतन व कुटुंबनिवृत्तीवेतनाचे नियम लागू राहतील.

( ७ ) दि.०१.०१.२००६ पूर्वी सेवानिवृत्त झालेल्या दुय्यम न्यायालयांतील न्यायिक अधिकारी संवर्गातील निवृत्ती वेतन धारकांना /कुटुंब निवृत्तीवेतन धारकांना पृष्ठ क्र.१ वरील अ.क्र.३ प्रमाणे अतिरिक्त निवृत्तीवेतनाचे फायदे अनुज्ञेय राहतील."

२. सदर शासन निर्णय वित्त विभागाच्या सहमतीने व त्यांच्या अनौपचारिक संदर्भ क्र.४७/२०११/का. सेवा-४, दि.२८.२.२०११ अन्वये निर्गमित करण्यात येत आहे.

३. सदर शासन शुध्दीपत्रक महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध असून त्यांचा संकेतांक क्र.२०११०३३०११३८१०००१ असा आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

( विजय आचलिया )
**प्रधान सचिव व विधी परामर्शी**

**प्रति,**

मा. राज्यपालांचे सचिव
मा. मुख्यमंत्र्यांचे प्रधान सचिव
मा. उप मुख्यमंत्र्यांचे प्रधान सचिव
मा. मंत्री (विधी व न्याय ) अणि त्यांचे स्वीय सहाय्यक
मा. राज्यमंत्री (विधी व न्याय ) अणि त्यांचे स्वीय सहाय्यक
महाप्रबंधक, उच्च न्यायालय, मुंबई
प्रबंधक, उच्च न्यायालय (मूळ शाखा), मुंबई
प्रबंधक, उच्च न्यायालय (अपील शाखा), मुंबई

63D:\desktop backup63 G R MEENA 7.10.lwp

महालेखापाल-एक /दोन (लेखा व अनुज्ञेयता), महाराष्ट्र, मुंबई /नागपूर
महालेखापाल-एक /दोन (लेखापरीक्षा ), महाराष्ट्र, मुंबई /नागपूर
संचालक, लेखा व कोषागारे, मुंबई
अधिदान व लेखा अधिकारी, मुंबई
निवासी लेखापरीक्षा अधिकारी, मुंबई
प्रमुख न्यायाधीश, नगर दिवाणी व सत्र न्यायालय, मुंबई
मुख्य महानगर दंडाधिकारी, मुंबई
प्रमुख न्यायाधीश, कौटुंबिक न्यायालय, मुंबई / पुणे /नागपूर /औरंगाबाद/अमरावती /अकोला/ठाणे.
मुख्य न्यायाधीश, लघुवाद न्यायालय, मुंबई
सर्व जिल्हा व सत्र न्यायाधीश
संचालक, न्यायीक अधिकारी प्रशिक्षण संस्था, नागपूर
सर्व जिल्हा कोषागार अधिकारी
धर्मादाय आयुक्त, मुंबई
विधी व न्याय विभागातील सर्व शाखा व कार्यासने
विधी व न्याय विभाग / का.७ (आवश्यक त्या कार्यवाहीसाठी)
वित्त विभाग ( व्यय-६, सेवा - ४)
सर्व मंत्रालयीन विभाग
निवडनस्ती.